"सबला" (राजीव गांधी किशोरवयीन मुलींचे सक्षमीकरण) योजना
<u>या केंद्र पुरस्कृत योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एबावि-२००९/प्र.क्र.१८५/का-५**
**नवीन प्रशासन भवन**
**३ रा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ३० एप्रिल, २०११.**

**पहा :-** १) शासन निर्णय,महिला व बाल विकास विभाग,क्र.एबावि-२००२/प्र.क्र.१४३/का-५, दिनांक : १६ फेब्रुवारी, २००६
२) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२३८/का-५, दिनांक : १४ सप्टेंबर, २००६
३) केंद्रिय महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अ.शा.पत्र क्र.६-५/२००९-RGSEAG-AG Cell, दिनांक : ३०.११.२००९
४) केंद्रिय महिला व बाल विकास मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-१२/२०१०-RGSEAG, दिनांक : २७.९.२०१०.

**प्रस्तावना** :- केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक २७.९.२०१० च्या पत्रान्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील बीड, नांदेड, मुंबई, नाशिक, गडचिरोली, बुलढाणा, कोल्हापूर, सातारा, अमरावती, नागपूर आणि गोंदिया या ११ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत असलेली किशोरी शक्ती योजना आणि नागपूर व नांदेड या दोन जिल्हयांमध्ये प्रायोगिक तत्वावर सुरु असलेली किशोरवयीन मुलींसाठी पोषण कार्यक्रम (NPAG) या दोन केंद्र पुरस्कृत योजनांचे विलिनीकरण (Merge) करुन किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणासाठी " सबला" (राजीव गांधी किशोरवयीन मुलींचे सक्षमीकरण) योजना ही केंद्र पुरस्कृत नवीन योजना सुरु केलेली असून सदर योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय** :- राज्यातील बीड,नांदेड,मुंबई, नाशिक, गडचिरोली, बुलढाणा,कोल्हापूर,सातारा, अमरावती, नागपूर आणि गोंदिया या ११ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत असलेली किशोरी शक्ती योजना (KSY) व किशोरवयीन मुलींसाठी पोषण कार्यक्रम (NPAG) या दोन केंद्र पुरस्कृत योजनांचे विलिनीकरण (Merge) करुन ११ ते १८ या वयोगटातील किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणासाठी "सबला" (राजीव गांधी किशोरवयीन मुलींचे सक्षमीकरण) योजना या केंद्र पुरस्कृत नवीन योजनेची अंमलबजावणी करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**२. "सबला" योजनेची ठळक वैशिष्टे खालील प्रमाणे आहेत :-**

२.१) ही योजना ११ ते १८ वर्ष वयोगटातील किशोरवयीन मुलींसाठी लागू राहील.

२.२) सदर योजनेतील पोषण खर्च वगळून इतर बाबींवर १००% खर्च केंद्र शासनाकडून अनुज्ञेय होईल.

२.३) **केंद्र शासनाचे** पोषण आहाराच्या खर्चाच्या **योजनेसंदर्भात** प्रति लाभार्थी प्रतिदिन रु.५/- प्रमाणे होणारा खर्च व प्रत्यक्ष झालेला खर्च यापैकी जो कमी असेल त्याच्या **५०% खर्च केंद्रशासनाकडून अनुज्ञेय राहील व ५०% खर्च राज्य शासनामार्फत करण्यात येईल.**

२.४) सदर योजना वर नमूद केलेल्या फक्त ११ जिल्हयांमधील २०७ प्रकल्पात लागू होईल.

२.५) केंद्र शासनाकडून प्रत्येक प्रकल्पांसाठी प्रतिवर्षी रु.३.८० लाख याप्रमाणे १००% तरतुद अनुज्ञेय राहील. त्याचा तपशिल खालील प्रमाणे आहे :-

| अ.क्र. | बाब | प्रति प्रकल्प खर्च |
|---|---|---|
| १ | सबला केंद्र | रु.२०,०००/- |
| २ | प्रशिक्षण साहित्य संच प्रति रु.१०००/- | रु.१,५०,०००/- |
| ३ | सखी सहेली प्रशिक्षण (५ दिवस) | रु.४०,०००/- |
| ४ | आहार व आरोग्य प्रशिक्षण,सार्वजनिक सेवेचा लाभ घेणे | रु.३०,०००/- |
| ५ | जीवनकौशल्य प्रशिक्षण | रु.३०,०००/- |
| ६ | व्यवसाय प्रशिक्षण | रु.५०,०००/- |
| ७ | किरकोळ खर्च (वाहतूक आणि किशोरी दिवस इ.साजरे करण्यासाठीचा खर्च) | रु.३०,०००/- |
| ८ | इतर खर्च (आरोग्य कार्ड छपाई, नोंदवहया इ.) | रु.३०,०००/- |
| | एकूण | रु.३,८०,०००/- |

**३: या योजनेची उद्दिष्टे खालीलप्रमाणे आहेत :-**

३.१) किशोरवयीन मुलींचा विकास व सक्षमीकरण करणे.

३.२) किशोरवयीन मुलींचा पोषण व आरोग्य विषयक दर्जा सुधारणे.

३.३) आरोग्य.स्वच्छता, पोषण, प्रजनन व लैगिक आरोग्य, कुटुंब आणि बालकांची काळजी या विषयी किशोरवयीन मुलींमध्ये जाणीव जागृती करणे.

३.४) किशोरवयीन मुलींची गृह कौशल्ये, जीवन कौशल्ये आणि व्यवसाय कौशल्य उंचावणे

३.५) शाळा गळती झालेल्या किशोरी मुलींना औपचारिक/अनौपचारिक शिक्षण देऊन त्यांना मुख्य प्रवाहात आणणे.

३.६) किशोरवयीन मुलींना प्रचलित सार्वजनिक सेवा उदा.प्राथमिक आरोग्य केंद्र, पोस्ट, बँक, पोलीस स्टेशन इत्यादीबाबत माहिती पुरविणे व मार्गदर्शन करणे.

**४: या नविन केंद्र पुरस्कृत योजनेचा लक्ष्यगट खालील प्रमाणे आहे :-**

४.१) सबला या योजनेअंतर्गत ११ ते १८ वर्ष वयोगटातील सर्व किशोरवयीन मुलींचा लाभार्थी म्हणून समावेश आहे.

४.२) किशोरी मुलींवर लक्ष केंद्रीत करता यावे यासाठी लक्ष्यगटाची ११ ते १४ वर्षे वयोगट आणि १५ ते १८ वर्षे वयोगट अशा दोन गटात विभागणी करुन नियोजन करण्यात यावे.

४.३) योजनेमध्ये ११ ते १८ या वयोगटातील शाळेत न जाणा-या सर्व (शालेय शिक्षण खंडीत झालेल्या) मुलींचा प्राधान्याने समावेश असून त्यांनी आठवडयातील २ ते ३ दिवस, एकूण ५ ते ६ तास अंगणवाडी केंद्रात किंवा इतर निवडलेल्या ठिकाणी, म्हणजे "सबला" केंद्रात हजर राहणे आवश्यक आहे.

४.४) शाळेत जाणा-या किशोरवयीन मुली सबला केंद्रात महिन्यातून किमान दोन वेळा आणि सुट्टयांमध्ये येणे अपेक्षित आहे.

४.५) सबला केंद्रात त्यांना जीवनविषयक कौशल्यांचे शिक्षण, आहार व आरोग्याचे शिक्षण आणि सामाजिक कायदे अंतर्गत विषयांची माहिती देण्यात यावी.

४.६) शाळेतील मुली व शाळेत न जाणा-या मुली यांची सबला केंद्रात एकत्र आल्यानंतर भेट होऊन त्यांचे वैचारिक अदानप्रदान व त्यातून शाळा सोडलेल्या मुलींना पुन्हा शिक्षणाकडे वळण्याची संधी निर्माण करण्यासाठी प्रयत्न करणे.

५. या योजनेअंतर्गत पुरक पोषण आहारासाठी प्रति लाभार्थी प्रती दिन रु.५/- या दराने किशोरवयीन प्रत्येक लाभार्थी मुलीला ६०० कॅलरी आणि १८-२० ग्रॅ.प्रोटीन आणि सुक्ष्म पोषण तत्वयुक्त (मायक्रो न्युट्रीयन्टस) आहार वर्षात ३०० दिवस देणे अपेक्षित आहे. शाळा सोडलेल्या ज्या किशोरी मुली आंगणवाडीत किंवा सबला केंद्रात येतील, त्यांना सध्या घरी नेवून खाण्यासाठी आहार (Micronutrient THR-Take Home Ration) देण्यात यावा.

११ ते १८ वर्ष वयोगटातील शाळेतून गळती झालेल्या सर्व मुलींना THR द्यावा, व १५ ते १८ वर्ष वयोगटातील शाळेत जाणा-या मुलींना THR पुरवठा करावा. दोन्ही गटांना THR पुरवठा अंगणवाडी केंद्रातून करावा व त्याचे वितरण व हिशोब रजिस्टर संबंधित अंगणवाडी केंद्रात ठेवावे.

THR पुरवठा ICDS अंतर्गत लाभार्थ्यांना सध्या तीन महिला संस्थेमार्फत करण्यात येत आहे. सबला योजनेंतर्गतही हयाच तीन महिला संस्थेमार्फत सध्या पुरवठा करावा, जेणेकरुन तातडीने पुरवठा सुरु होऊ शकेल.

खालील सर्व पाककृतीसाठी लाभार्थ्यानुसार २५ दिवसांची (१ महिना) पॅकिंग साईज, प्रति दिन प्रति लाभार्थी सर्व्हींग साईज, प्रति दिन प्रति लाभार्थी आर्थिक निकष केंद्र व राज्य शासनाच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार प्रति दिन प्रति लाभार्थ्यास द्यावयाचा शिरा, उपमा व सुकडी या आहाराचे प्रमाणानुसार महिन्यातील पंचविस दिवसासाठीच्या आहाराची पाकिटे तयार करुन प्रति लाभार्थीस देय असलेल्या पंचविस दिवसासाठीच्या प्रमाणकानुसार खालील कोष्टकाप्रमाणे लाभार्थींना THR आहाराची पाकिटे पुरविण्यात यावीत. त्यासाठी THR पुरवठयाचा तपशिल व अंमलबजावणीची कार्यवाही महाराष्ट्र शासन, महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००८/प्र.क्र.५९/का-५, दि.२४/८/२००९ नुसार करण्यात यावी.

| अ.क्र | लाभार्थ्यांचा प्रकार | आहाराचा प्रकार | आहार वाटपाचा तपशिल प्रति लाभार्थी प्रति दिन | प्रति लाभार्थी प्रति दिन दर रुपये | एका महिन्यात द्यावयाच्या आहाराचे दिवस | एका महिन्यामध्ये प्रति लाभार्थ्यास द्यावयाच्या आहाराचे प्रमाण (ग्रॅम) (२५ दिवसासाठी आहार व पाकिटाची साईज) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | किशोरवयीन मुली | सुकडी | १३० ग्रॅम | रु.५/- | ८+१ = ९ | ११७० ग्रॅम |
| | | उपमा | १३० गॅम | | ८ दिवस | १०४० ग्रॅम |
| | | शिरा | १४० ग्रॅम | | ८ दिवस | ११२० ग्रॅम |

६. किशोरवयीन मुलींच्या पोषण आहाराच्या किंमतीच्या ५०% किंवा प्रत्यक्ष खर्चाच्या ५०% रक्कम यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे अनुदान केंद्र शासनाकडून प्राप्त करुन घेण्यासंदर्भात आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे हे केंद्र शासनास दर तिमाहीस खर्चाचे विवरण पत्र पाठवतील तसेच खर्चावर योग्य नियंत्रण ठेवण्याबाबत कार्यवाही करतील.

७. सबला योजनेखाली पुरविण्यात येणा-या सेवा संदर्भात खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.
७.१) <u>आहार</u> - सध्या THR म्हणजे घरपोच आहार पाकिटे पुरविण्याची व्यवस्था राज्य पातळीवरुन करण्यात येणार आहे. आहार खरेदीसाठी आयुक्त यांनी आवश्यक कार्यवाही करावी. परंतु भविष्यात टप्प्याटप्प्याने महिला बचत गटांमार्फत THR चा पुरवठा करण्याचे प्रयत्न करावेत. त्यासाठी आहारतज्ञ यांच्या मदतीने अशा THR च्या पाककृती (Recipies) विकसीत करावे, त्यांची shelf life (टिकाऊ कालावधी) किमान २० दिवस असली पाहिजे, तसेच रु.५ दरात तो बसला पाहिजे. महिला बचत गटामध्ये THR पुरवठा करण्याची क्षमता निर्माण झाल्यानंतर त्यांनी शासनाकडे अर्ज करावा व भविष्यात त्याबाबत त्यांना आदेश देण्याबाबत निर्णय घेण्यात येईल.

७.२) शाळेतून गळती झालेल्या व शाळेत जाणा-या, या दोनही गटातील मुलींना THR चा पुरवठा करण्यात यावा. पुरवठादाराकडून THR चा पुरवठा झाल्यानंतर त्याचा साठा ठेवण्यासाठी व मुलींना

पाकीटाचे वाटप करण्यासाठी शक्यतो अंगणवाडी हे केंद्र राहील. परंतु काही कारणामुळे (उदा.अंगणवाडी इमारत नसल्यास) इतर उपयुक्त व सुरक्षीत जागा निश्चित करावी (उदा.शाळेची खोली इ.) व त्या केंद्रातून मुलींना THR पाकिट वाटप करावे.

७.३) **IFA (लोहयुक्त गोळया) व जंतनाशक गोळया** :- IFA गोळयां वाटपाची सुरुवात होण्यापूर्वी सर्व मुलींना एक जंतनाशक गोळी (Albendazole) देण्यात यावी. सदर गोळी ६ महिन्यात फक्त एकदा द्यावयाची असतात. त्यासाठी स्वतंत्र खरेदी करण्याची गरज नसून, उपकेंद्र व प्राथमिक आरोग्य केंद्राच्या अस्तित्वात असलेल्या औषध साठयातून सदर गोळया पुरविण्यात याव्यात. जंतनाशक गोळी दिल्यानंतर एक आठवडा थांबून मग IFA गोळी देण्याची सुरुवात करावी.

सर्व शाळेत जाणा-या मुलींना (११ ते १८ वर्षापर्यंत) IFA गोळया पुरवठा करण्याची व्यवस्था शालेय शिक्षण विभागाने करावी. तसेच आश्रम शाळेत जाणा-या आदिवासी मुलींना IFA गोळया वाटप करण्याची जबाबदारी व त्यासाठी आर्थिक तरतूद करण्याची जबाबदारी आदिवासी विकास विभागाची राहील. तसेच अनुसूचीत जातीच्या , शाळा व हॉस्टेलमध्ये मुलींना गोळया वाटप करणे व त्यासाठी आर्थिक तरतूद करण्याची जबाबदारी सामाजिक न्याय विभागाची राहील. फक्त शाळेतून गळती झालेल्या मुलींसाठी IFA गोळयांची खरेदी व वाटप करण्याची जबाबदारी महिला व बाल विकास विभागाची राहील व यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास यांनी सबला योजनेखाली उपलब्ध निधीतून IFA गोळयाची खरेदी करावी.

भविष्यात NRHM/RCH च्या निधीतून शाळेतून गळती झालेल्या मुलींसाठी IFA गोळयांची खरेदी करण्याचा विचार करण्यात येईल.

सर्व मुलींना आठवडयात एकदा IFA गोळी खाऊ घालावी.

७.४) **हिमोग्लोबीन (Hb) तपासणी (रक्त तपासणी)** शाळेत जाणा-या मुलींची रक्त तपासणीची जबाबदारी आरोग्य विभागाच्या शालेय आरोग्य कार्यक्रमांतर्गत (NRHM/RCH अंतर्गत) वैद्यकिय तपासणी पथकाची राहील. शाळेत जाणा-या ज्या मुलींची रक्त तपासणी वरील पथकामार्फत करण्यात येत नसतील तर त्या क्षेत्राच्या ANM मार्फत मुलींची रक्त तपासणी करुन घेण्याची जबाबदारी शालेय शिक्षण विभागाची राहील. तसेच शाळेतून गळती झालेल्या मुलींची रक्त तपासणीची जबाबदारीही संबंधित ANM ची व सार्वजनिक आरोग्य विभागाची राहील.

सर्व किशोरवयीन मुलींची किमान ६ महिन्यात एकदा आरोग्य तपासणी करण्याची जबाबादारी आरोग्य विभागाची राहील व त्याची नोंद किशोरवयीन मुलींच्या आरोग्य कार्डमध्ये घेण्यात यावी. मुलींचे वजन, उंची व रक्त (Hb) याची नियमितपणे नोंदणी त्यांच्या आरोग्य कार्डमध्ये घेण्यात यावी.

७.५) **किशोरी कार्डस (Health cards)** :- प्रत्येक मुलींसाठी एक आरोग्य कार्ड छापण्याची जबाबादारी आयुक्त महिला व बाल विकास यांची राहील. सदर कार्डाचा नमूना केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला आहे. त्याप्रमाणे छपाई करण्यात यावी. **प्रत्येक मुलींकडे तिचे कार्ड तिच्या सुपुर्द करण्यात यावे.** तिला स्वत: नोंदणी करण्यासाठी प्रशिक्षित करण्यात यावे. सदर कार्ड टिकण्यासाठी प्लॅस्टिक पिशवीसह ठेवण्याची तिला सूचना देण्यात यावी.

७.६) **प्रशिक्षण :-** केंद्र शासनाच्या NIPCCD या प्रशिक्षण संस्थेमार्फत सर्व प्रशिक्षण अभ्यासक्रम (Modules) तयार करण्यात येत आहे, व प्रशिक्षकांचे प्रशिक्षण (Training of Trainers/ TOT )

याचा अभ्यासक्रमही तयार करण्यात येत आहे. त्याचा वापर करुन प्रशिक्षकांना व किशोरवयीन मुलींना प्रशिक्षण देण्यात यावे. सदर अभ्यासक्रम प्राप्त होईपर्यंत इतर उपलब्ध अभ्यासक्रमाचा वापर करता येईल. उदा.आरोग्य विभागाने, UNFPA, वैद्यकीय महाविद्यालय, इ. यांनी तयार केलेले अभ्यासक्रम. NIPCCD चे अभ्यासक्रम प्राप्त झाल्यानंतर त्यात काही मुलभूत बदल न करता त्याचा वापर करावा. मात्र त्यात काही वाढ करावयाची असल्यास ते करावयास हरकत नाही. वरील प्रशिक्षण देण्यासाठी चांगल्या स्वयंसेवी संस्था, होम सायन्स, वैद्यकीय महाविद्यालय, युनिसेफचे प्रशिक्षक, UNFPA चे प्रशिक्षक, आरोग्य विभागाचे प्रशिक्षक यांची मदत घेऊन प्रशिक्षण देण्यात यावे. प्रशिक्षणासाठी सबला योजनेखाली उपलब्ध निधीशिवाय इतर योजनांतील उपलब्ध तरतूदींचाही वापर करण्यात यावा.

**७.७) सखी व सहेलीची निवड** :- प्रत्येक अंगणवाडी क्षेत्रातून एक सखी व २ सहेली अशा ३ किशोरवयीन मुलींची निवड त्वरीत करावी. त्या मुलींना गट पातळीवर किंवा बीट पातळीवर प्रशिक्षकांमार्फत प्रशिक्षण देण्यात यावे. सखी व सहेली यांनी गावातील इतर किशोरवयीन मुलींना Girl to Girl approach हया मार्गाने प्रशिक्षण देणे अपेक्षित आहे. शाळेतून गळती झालेल्या व इतर मुलींचे किशोरी समुह तयार करण्यात यावे व त्यांच्या बैठकांसाठी गावात उपयुक्त जागेची निवड करण्यात यावी. अंगणवाडीत जागा व सुविधा असल्यास त्याला "सबला केंद्र" घोषित करुन तेथे प्रशिक्षण देण्यात यावे. परंतु अंगणवाडीत जागा किंवा व्यवस्था उपलब्ध नसल्यास गावात इतर उपयुक्त जागेला "सबला केंद्र" घोषित करुन त्याठिकाणी किशोरींची प्रशिक्षण व्यवस्था करण्यात यावी.

**७.८) आठवडयात २ किंवा ३ दिवस** बैठका घेऊन सखी व सहेली यांनी किशोरी समुहाच्या इतर किशोरी व मुलींना प्रशिक्षण द्यावे. आठवडयात ५ ते ६ तास प्रशिक्षण देणे अपेक्षित आहे. म्हणजे आठवडयात २ दिवस, ३-३ तास प्रतिदिवस, किंवा आठवडयात ३ दिवस, २-२ तास प्रति दिवस, याप्रमाणे सबला केंद्रात प्रशिक्षण देण्यात यावे.

७.९) सबला केंद्रात विविध निधीतून आवश्यक साधनसामुग्री उपलब्ध करुन द्यावी उदा.ग्रंथालयासाठी पुस्तके, मासिके व वर्तमानपत्र, संगणक, (देणगीद्वारे /सेकंडहॅंड संगणक) ही ठेवता येतील. बसण्याची, पाण्याची व्यवस्था करण्यात यावी.

**७.१०) रजिस्टर :-** किशोरींना पुरविण्यात येणा-या सेवांची नोंदणी करण्यासाठी स्वतंत्र रजिस्टर ठेवण्यात यावे व सदर रजिस्टरमध्ये नोंदणी करुन त्यांना अद्यावत ठेवण्याची जबाबदारी सखी व सहेली यांची राहील. त्यात मुलींना आहाराचे वाटप, जंतुनाशक व IFA गोळयांचे वाटप, रक्त तपासणी, वैद्यकिय तपासणी इ.च्या अद्यावत नोंदी ठेवण्यात याव्यात व यासाठी सखी व सहेली यांना प्रशिक्षण द्यावे.

**७.११) प्रशिक्षणाचा तपशिल :-** या मुलींना खालील प्रकारचे प्रशिक्षण देण्यात यावे. :-

I. आरोग्य, स्वच्छता, Menstrual hygiene, प्रजनन व लैंगिक आरोग्य, शरीराचा विकास, कुटुंबनियोजन व शस्त्रक्रिया इ.

II. पोषण व आहार, पौष्टिक आहार शिजविण्याच्या पध्दती, पोषण आहाराचे प्रात्यक्षिक, (Nutrition Demonstration)

III. लहान मुलांची काळजी, कुटुंबनियोजन व मुलांमध्ये अंतर ठेवण्याचे महत्त्व, स्तनपानाचे महत्त्व इ.

IV. **व्यवसायिक प्रशिक्षण** :- यासाठी प्राधान्याने केंद्र शासनाच्या MES या योजनेखाली निश्चित करण्यात आलेल्या प्रशिक्षण केंद्रामार्फत (VTP केंद्र) प्रशिक्षण आयोजित करण्यात यावे. परंतु सदर VTP प्रशिक्षण संस्था उपलब्ध नसल्यास, किंवा जवळच्या अंतरावर स्थीत नसल्यास किंवा मुली त्यांच्या आवश्यक शैक्षणिक पात्रता पूर्ण करीत नसल्यास, त्यांना इतर मार्गानेही व्यवसाय प्रशिक्षण देण्यात यावे.

V. **जीवन कौशल्य (life Skills) प्रशिक्षण** :- यामध्ये खालील विषयाचा समावेश करावा. महिलांशी संबंधित कायदे, सामाजिक समस्या उदा.लहान वयात लग्न, समाजात मुलींचे दुय्यम स्थान, जेंडर, लैंगिक शोषणापासून संरक्षण, आत्मविश्वास निर्मिती इ.

VI. **अभ्यास दौरा** (field visits) :- मुलींना फक्त classroom प्रशिक्षण न देता त्यांना प्रात्यक्षिक प्रशिक्षण देण्यासाठी त्यांना खालील संस्था व कार्यालयाला भेटीसाठी अभ्यास दौ-याचे आयोजन करावे :- तहसिल कार्यालय, पंचायत समिती कार्यालय, प्राथमिक आरोग्य केंद्र किंवा उपकेंद्र, रुग्णालय, पोलिस स्टेशन, बँक, ATM, पोस्ट ऑफिस, रेल्वेस्टेशन, महाविद्यालये, स्वयंसेवी संस्था, लघुउद्योग, न्यायालय, इ. मात्र हया दौ-यासाठी सबला योजनेत आर्थिक तरतूद केली नसल्यामुळे त्यासाठी इतर निधीमध्ये आर्थिक तरतूद करण्यात यावी, उदा. विविध विभागांच्या कार्यालयीन खर्चातून इ. सदर दौरे आयोजित करण्यासाठी विविध शासकीय व निमशासकीय कार्यालयांना उद्दिष्टे वाटप करण्यात यावे. उदा. प्रत्येक तहसिल कार्यालयाने एका महिन्यात किमान २० ते ३० किशोरींना एक दिवस प्रशिक्षण देण्यात यावे. तहसिल कार्यालयात महिलांशी संबंधित कामाबद्दल त्यांची जनजागृती करावी. उदा. जन्म/मृत्यू नोंदणी, विवाह नोंदणी, ७/१२ उतारा पती-पत्नीची नावे, मालमत्ता हक्क, इ.

VII. **किशोरी किट्स** :- प्रत्येक सबला केंद्रात किशोरी किट्स, राज्यस्तरावरुन खरेदी करुन पुरविण्यात येतील. परंतु सदर किट्स पुरवठा होईपर्यंत स्थानिक पातळीवर खालील वस्तुचे किट्स संकलित करण्यात यावे व सबला केंद्रात पुरविण्यात यावे :- जन्म व मृत्यू दाखल्याचे (Sample) सँपलची १-१ प्रत, विवाहनोंदणी प्रमाणपत्राची १ प्रत, रजिस्टर्ड मॅरेज (नोंदणी पध्दतीने विवाह) प्रमाणपत्राची एक प्रत, पोलिसांकडे FIR ची सँपल प्रत, जमिनीच्या मालकीबद्दल ७/१२ उता-याची एक प्रत, बँकेचे एक पासबूक (भरलेले) , एक चेकबुकचे सँपल, एक ATM कार्डचे सॅपल, महाराष्ट्र राज्याचा नकाशा, जिल्हयाचा नकाशा (Tourist Map), कंडोम्स, तांबी, I-Pill, गर्भनिरोधक गोळी (Mala D ) या सर्वांचे Sample, एका जुन्या मोबाईल फोनचे सॅपल, १ नेलकटर, १ लहान कैची, १ रेझर, सॅनिटरी नॅपकीन पॅड (नमूना) एखादे मनगटी घडयाळ, कॅलेंडर, (सुट्टीसह), दोरीच्या उडया, चेंडू, रिंग / फ्रिसबी, एखादी जुनी सायकल, I.D.कार्ड नमूना, एखादे जुने संगणक यंत्र, शिक्षणाच्या CDs, काही हिंदी फिल्मस् C.D.s.उदा. चक दे

इंडिया, इक्बाल, डोर, ३ इडियट्स, तारे जमिन पर इ., एक रेडिओ, जुना टिव्ही, इ. सदर वस्तू व दाखलयांचे नमूने त्वरित संकलित करण्यात यावे.

सदर वस्तूसाठी निधी उपलब्ध नसल्यास देणगीच्या स्वरुपात सदर वस्तू संकलीत करण्यात यावी.

वरील मुद्यांवर इतर सविस्तर सूचना स्वतंत्रपणे देण्यात येतील.

८. **योजनेच्या अंमलबजावणीची जबाबदारी व योजनेचे नियंत्रण** :- योजनेचे अनुदान व प्रशासकीय नियंत्रणाबाबत, राज्यस्तरावर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे प्रशासकीय प्रमुख असतील. आयुक्त, महिला व बाल विकास पुणे हे विभाग प्रमुख व अंमलबजावणी व नियंत्रण अधिकारी राहतील. जिल्हा स्तरावर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिशद व प्रकल्प स्तरावर बाल विकास प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत अंमलबजावणी करण्यात येईल. ही योजना अंगणवाडी स्तरावरुन किंवा अंगणवाडी इमारत उपलब्ध नसलयास किंवा त्यात जागा नसल्यास, त्याऐवजी इतर अपयुक्त ठिकाणी म्हणजे " सबला केंद्रात" राबविण्यात येईल, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेच्या यंत्रणेचा उपयोग् योजनेच्या अंमलबजावणीसाठी करणेत येइरल. सदर यंत्रणा त्यांचे क्षेत्रातील सर्वेक्षण करुन किशोरी मुलींची नोंदणी करुन त्यांना अंगणवाडी केंद्रात येण्याचा सल्ला देईल. पर्यवेक्षिकांच्या मदतीने बाल विकास प्रकल्प अधिकारी हे प्रकल्प क्षेत्रात योजनेची अंमलबजावणी करण्यास जबाबदारी राहतील.

९. वरील योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार करण्यात यावी.

**१०. आर्थिक तरतूद** :- सबला योजनेची राज्यातील बीड, नांदेड, मुंबई, नाशिक, गडचिरोली, बुलढाणा, कोल्हापूर, सातारा, अमरावती, नागपूर आणि गोंदिया या ११ जिल्हयांत अंमलबजावणी करण्यासाठी २०११-२०१२ या चालू वित्तीय वर्षात प्रति प्रकल्प रु.३.८० लक्ष प्रमाणे २०७ प्रकल्पांसाठी रु.७,८६,६०,०००/- आणि पोषण आहारासाठी रु. १४२,५५,०८,५००/- असा मिळून एकूण रु. १५०,४१,६८,५००/- (रु.एकंशे पन्नास कोटी एक्के चाळीस लाख अडूसष्ट हजार पाचशे फक्त ) (रु.१५०.४२ कोटी) एवढा खर्च करण्यास शासन मान्यता देत असून, आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना नियंत्रक तथा आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या योजने अंतर्गत होणारा खर्च कोणत्या उप लेखाशिर्षाखालील तरतूदीतून भागविण्यात यावा याबद्दल स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ज. कि. मगरे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई

३) मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
५) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
७) अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल, आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई.
९) प्रधान सचिव व आयुक्त, आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५) आयुक्त, महिला व बाल विकास पुणे
१६) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१७) कुलगूरु, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, दिंडोरी रोड, नाशिक
१८) राज्यसमन्वयक (पी.पी.एम.यु.), महिला व बाल विकास मंत्रालय, मुंबई
१९) विभागीय आयुक्त (सर्व)
२०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, विधान भवन, मुंबई
२१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२२) संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोगय मिशन, आरोग्य भवन,मुंबई
२३) अधिष्ठाता, सर्व वैद्यकीय महाविद्यालय (शासकीय/खाजगी)
२४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण भवन, पुणे
२५) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
२६) जिल्हाधिकारी (सर्व)
२७) उपसंचालक, आरोग्य सेवा प्रादेशिक मंडळ (सर्व)
२८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२९) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३०) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल विकास) जिल्हा परिषद (सर्व)
३१) जिलहा श्ल्यचिकित्सक (सर्व)
३२) मुख्याधिकारी, नगरपालिका व नगर परिषद
३३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण आदिवासी प्रकल्प) (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
३४) (कार्यासन ०५) निवड नस्ती.